**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळांच्या इमारत संकुल बांधकामाचे अंदाजपत्रके व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.५५०/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ जानेवारी, २०११.

**वाचा** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.अशा.जा.क्र.का-३/इमा/५५/२०१०, दि.२०/०७/२०१०.
२) शासनाचे पत्र क्र.बैठक-२०१०/प्र.क्र.३५५/का.१३, दि.३/८/२०१०.
३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.शाआवबां-२०१०/प्र.क्र.२४/का.८(२) दिनांक २८ ऑक्टोबर, २०१०.
४) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचा शासन निर्णय क्र:मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र.३४/३९, दि.६/८/२०१०.

**शासन निर्णय** : आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी त्यांच्या संदर्भ दि.२८/१०/२०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांच्या कार्यक्षेत्रातील खालील तक्त्यात दर्शविलेल्या ३ शासकीय आश्रमशाळांचे इमारत संकुल बांधकाम करण्याबाबत अंदाजपत्रके व आराखडे इत्यादींसह प्रशासकीय मान्यतेसाठी सविस्तर प्रस्ताव शासनास सादर केले आहे.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | तालुका | जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | नंदूरबार | कोडीद | शिरपूर | धुळे | ९,९२,१५,७६४/- |
| २ | | लौकी | शिरपूर | धुळे | ५,००,००,०००/- |
| ३ | | निजामपूर | नवापूर | नंदूरबार | ७,०७,९२,०२१/- |

सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने उपरोक्त तक्त्यातील शासकीय आश्रमशाळेचे सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आले होते.

२. सदर सविस्तर अंदाजपत्रके व आराखडे संबंधित सहाय्यक अभियंता यांनी तयार केले असून संबंधित उपविभागीय अभियंता/अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उप विभाग यांनी तपासले आहे. तसेच

संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे यांनी साक्षांकित केली आहेत.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेंचे अंदाजपत्रके सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर शासकीय आश्रमशाळेंच्या अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर खालील तक्त्यात दर्शविलेल्या अंदाजपत्रकीय रकमेस पुढील अटींच्या अधिन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक सहमती दिलेली आहे.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | तालुका | जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | नंदूरबार | कोडीद | शिरपूर | धुळे | ९,७३,९७,४०९/- |
| २ | | लौकी | शिरपूर | धुळे | ४,७६,८५,१४४/- |
| ३ | | निजामपूर | नवापूर | नंदूरबार | ६,९८,४१,८७२/- |

अटी :-

(अ) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच वापरावयाच्या नमुना नकाशास व विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

(ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(क) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

४. तरी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त तक्त्यातील शासकीय आश्रमशाळा इमारत बांधकाम तसेच मुला/मुलींचे वसतिगृह बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकातील सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सूचविल्याप्रमाणे ४ % आकस्मिक खर्च, ८% बाह्य पाणीपुरवठा व मल:निस्सारणची व ११% विधुतीकरणाची तरतूद योग्य करण्यात आली आहे. तसेच अंदाजपत्रकातील आर्किटेक्चरल इलेव्हेशनची तरतूद वगळून उपरोक्त परिच्छेद -३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या तकत्यातील अंदाजपत्रकीय रक्कमेस **(अ), (ब) व (क)** येथील अटींच्या आधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. मात्र **सदर बांधकामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकाम सुरु करु नये.**

५. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

F:\BACKUP\D\2010\Construction\P.W.D\ATC Nashik\P.O.NandurbarC.R.550.lwp

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०११०१०७१८५९०२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास द.भंडलकर )
उप सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हाधिकारी, धुळे/नंदूरबार.
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे/नंदूरबार.
जिल्हा नियोजन अधिकारी, धुळे/नंदूरबार.
श्री.सी.डी.वाघ,कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगांव (समन्वय अधिकारी)
कार्यकारी अभियंता, रो.ह.यो. सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदूरबार.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (रो.ह.यो.), धुळे.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१, शिरपूर, जि.धुळे.
उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, नंदूरबार.
कक्ष अधिकारी (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

F:\BACKUP\D\2010\Construction\P.W.D\ATC Nashik\P.O.NandurbarC.R.550.lwp